राष्ट्रीय ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत मौजे आडगाव (पिशोर), ता. कन्नड, जि. औरंगाबाद या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१८/प्र.क्र.१२६/पापु १८**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: ०३ ऑक्टोबर, २०१८

वाचा -

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./ जि.प.औ./ पापु/निविदा/२०१८/७९६८, दि.२४/०४/२०१८.
२) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-७ दि. ९/१०/२०१३.
३) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-७, दि.१७/०३/२०१०.
४) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११३/प्र.क्र.१५६/पापु-७, दि. २२ जानेवारी, २०१४.
५) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/पापु-७, दि.९/७/२०१४.
६) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११४/प्र.क्र.५२/पापु-७/, दि.१७/१०/२०१४.
७) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११५/प्र.क्र.२२/पापु-७/दि.१६/०२/२०१५.
८) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो ११११/प्र.क्र.१३४/पापु-७,दि.२०/०२/२०१५.
९) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११४/प्र.क्र.६१/पापु-७, दि. १५ /६/२०१५.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे **आडगाव (पिशोर), ता.कन्नड, जि.औरंगाबाद येथील** नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र १.येथील पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे .मौजे आडगाव (पिशोर), ता.कन्नड, जि.औरंगाबाद या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, औऱंगाबाद यांनी दि. २७.०४.२०१८ रोजी तांत्रिक मान्यता दिली आहे. तदनुषंगाने मौजे आडगाव (पिशोर), ता.कन्नड, जि.औरंगाबाद या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे **आडगाव (पिशोर), ता.कन्नड, जि.औरंगाबाद** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३८८५/- एवढया वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु.१,९६,००,०००/-(ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी शहाण्णव लक्ष फक्त) एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुढील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## अटी

१. सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी करावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्षे योजनेची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी कंत्राटदारावर बंधनकारक राहील.

२. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.

३. योजनेसाठी आवश्यक भुसंपादन व इतर सर्व परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेस कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत. सदर अटीची पूर्तता न करताच कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत. सदर अटीची पुर्तता न करताच कार्यारंभ आदेश दिल्यास या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्य समजण्यात येईल.

४. योजनेची कामे मंजुर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्या-टप्याने पूर्ण करण्यात यावीत.

५. योजनेचा उदभव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उदभवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

६. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी सविस्तर प्रकल्प अहवालात दर्शविलेला खर्चाचा तपशिल दुरुस्त करुन सदर खर्च किमान ठेवावा. तसेच सदर खर्च भागवीण्याकरिता व योजना आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने घरगुती नळ धारकासाठी किमान पाणी पटटीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

७. योजना चालविणे, त्याचे परिक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

८. अस्तित्वातील स्तोत्रांचे बळकटीकरण करण्यात यावे.

९. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१०.संदर्भाधीन क्र.४ येथील २२ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीचे धोरण राबविण्यात यावे.

११.सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच प्रचलित शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.

१२.योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपटटी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरुवात करावी.

१३.योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

१४.योजनेच्या अंमलबजावणी मध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

१५.योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखल संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त करून घेवून शासनास सादर करण्याची जाबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), यांची राहील.

१६) योजना प्रचलीत शासन धोरणानुसार राबविण्यात येत आहे याची दक्षता घ्यावी.

१७) ग्रामपंचायतीकडे विजबील थकबाकी असल्यास ती पूर्ण भरल्याशिवाय कार्यादेश देण्यात येऊ नये.

१८)पूर्वीच्या योजनेचे लेखे आर्थिकदृष्टया पूर्ण केले आहेत किंवा कसे ही बाब तपासणे संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. लेखे पूर्ण करणे आवश्यक आहे.

३. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणा-या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेताक २०१८१००३१६४४०६२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2018.10.03 16:50:01 +05'30'

**( सु.स.राठोड )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.

२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) कार्यासन (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१८) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.